महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना हरीत ऊर्जा निधी कार्यकम (G.C.F.) अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरित करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/प्र.क्र. २९४ / ऊर्जा-७.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २८ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :**

१. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र.अपाऊ-२००७/प्र.क्र.६९३/उर्जा-७, दि.१४.१०.२००८.
२. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र.पवन-२००९/प्र.क्र.१३१८/उर्जा-७, दि.१७.०२.२००९.
३. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र.पवन-२००९/प्र.क्र.१४६७/उर्जा-७, दि.२६.११.२००९.
४. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र.पवन-२०१०/प्र.क्र.१३४/उर्जा-७, दि.१४.०७.२०१०.
५. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र.अपाऊ २०१३/प्र.क्र.१२१/उर्जा-७, दि.२१.०८.२०१३.
६. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र.अपाऊ-२०१५/प्र.क्र.४९/उर्जा-७, दि.२०.०७.२०१५.
७. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र.अपाऊ २०१५/प्र.क्र.४९(भाग-८)उर्जा-७, दि.०९.०९. २०१५.
८. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग,क्र. बियुडी-२०१९/प्र.क्र.१०२/उर्जा-७, दि.०८.०३.२०१९.
९. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. पवन-२०१८/प्र.क्र.५०१/उर्जा-७, दि. १३.०३. २०१९
१०. शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र. बीयुडी-२०१९/प्र.क्र.८७/उर्जा-७, दि. ३०.०३. २०१९
११. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र: अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८.०७. २०१९.
१२. महाऊर्जा कार्यालयाचे पत्र क्र: लेखा/बीपी-०२०/जी.सी.एफ:१९-२०/२०१९-२०/३१७६. दि.२०.०९.२०१९ व क्रमांक १०३, दिनांक ०८.०१.२०२०

**प्रस्तावना :-**

सहवीज निर्मिती प्रकल्पांतर्गत द्यावयाचा निष्कासन व्यवस्था व भांडवली अनुदानाच्या परताव्याबाबत शासन निर्णय, दि.१४/१०/२००८ मधील तरतूद पाहता महाऊर्जाने सादर केलेल्या प्रस्तावामधील ४ कारखान्यांपैकी भांडवली अनुदान देण्यासाठी व निष्कासन व्यवस्थेच्या खर्चाचा परतावा करण्यासाठी अटींची पुर्तता करणाऱ्या २ कारखान्यांना रु ४.९५४३ कोटी अनुदान वितरीत करण्याची बाब विचाराधीन आहे.

२. लघुजल विद्युत निर्मिती प्रकल्पांतर्गत द्यावयाचा निष्कासन व्यवस्था व भांडवली अनुदानाच्या परताव्याबाबत अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपासून वीज निर्मितीच्या पारेषण संलग्न प्रकल्पांसाठी एकत्रित धोरण-२०१५, दि. २०/०७/२०१५ मधील शासन धोरणातील तरतूद पाहता महाऊर्जाने सादर केलेल्या प्रस्तावामधील ६ लघुजल विद्युत निर्मिती प्रकल्पांपैकी ४ लघुजल विद्युत निर्मिती प्रकल्प कार्यान्वीत झाले असून त्यांना भांडवली अनुदान व निष्कासन व्यवस्थेच्या खर्चाचा परतावा रक्कम रु. ७.६२२३ कोटी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

३. बायोगॅस (बायोमिथेनेशन) तंत्रज्ञानावर आधारित विकेंद्रीत वीज निर्मिती प्रकल्पांसाठी अर्थसहाय्याबाबत नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांपासून विकेंद्रीत पारेषण विरहित ऊर्जा निर्मितीचे एकत्रित धोरण-२०१६ नुसार आता बायोगॅस (बायोमिथेनेशन) तंत्रज्ञानावर आधारित विकेंद्रीत वीज निर्मिती प्रकल्प योजना १३ व्या वित्त आयोगाच्या निधीमधून तरतूद होणार नसल्याने सदर योजनेस हरीत ऊर्जा निधीमधून रुपये ७.८७२० कोटी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

४. सौर उष्णजल संयंत्राकरिता शासन निर्णय ११/०२/२०१६ च्या नवीन व नवीकरणीय ऊर्जास्त्रोतांपासून विकेंद्रीत पारेषण विरहित ऊर्जा निर्मितीचे एकत्रित धोरण-२०१६ अन्वये हरित ऊर्जा निधीमधून पुढील ५ वर्षासाठी दरवर्षी रु.८.०० कोटी इतक्या रक्कमेची तरतूद करण्यात आली आहे. हरित ऊर्जा निधी कार्यक्रमातंर्गत सौर उष्णजल संयंत्र आस्थापित करण्यासाठी रु. १५.४७३५ कोटी वितरित करण्यासाठी विभागनिहाय लाभार्थ्यांची यादी सादर केली आहे. त्यानुषंगाने सन २०१९-२० मध्ये रुपये १५.४७३५ कोटी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

५. सौर औष्णिक कार्यक्रम - स्टीम कुकिंग सिस्टीम साठी शासन निर्णय ११/०२/२०१६ च्या नवीन व नवीकरणीय ऊर्जास्त्रोतांपासून विकेंद्रीत पारेषण विरहित ऊर्जा निर्मितीचे एकत्रित धोरण-२०१६ अन्वये शासकीय क्षेत्र वगळता इतर क्षेत्रासाठी स्वयंपाकासाठी सौर ऊर्जेवर आधारित संयंत्र आस्थापित करण्याकरिता अर्थसहाय्य म्हणून १३ व्या वित्त आयोगाच्या निधीमधून पुढील ५ वर्षांसाठी दरवर्षी रु. ४.०० कोटी इतक्या रकमेची तरतूद करण्यात आली आहे. तथापि, १३ व्या वित्त आयोगाच्या निधीमधून आता निधी उपलब्ध होणार नसल्याने महाऊर्जाने प्रस्ताविल्याप्रमाणे सदर प्रकल्पाकरिता हरित ऊर्जा निधीमधून ४.७८४८ कोटी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांच्या प्रस्तावानुसार, हरित ऊर्जा निधी कार्यक्रम (G.C.F.) अंतर्गत सोबतच्या परिशिष्ट अ ते ई मध्ये नमूद केलेल्या योजनांच्या/प्रस्तावांच्या अंमलबजावणीसाठी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना रु. ४०.७०६९ कोटी (रु.चाळीस कोटी सत्तर लाख एकोणसत्तर हजार फक्त) इतके अनुदान वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री. उ. द. वाळुंज, सह सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री. ना. रा. ढाणे, अवर सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नावे अदा करण्यात यावा.

४. हरीत ऊर्जा निधी कार्यक्रम अंतर्गत विविध योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम केवळ हरीत ऊर्जा निधी कार्यकम (G.C.F.) अंतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची खातरजमा करण्यात यावी. सदर निधी खर्च करण्यापूर्वी संबंधित प्रकल्पांना सक्षम प्राधिकाऱ्यांकडून प्रत्यक्ष खर्चाच्या अनुषंगाने प्रशासकीय व तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. विहित कालावधीत निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता महाऊर्जाकडू पडून राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदारी निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी महासंचालक, महाऊर्जा यांची राहील, याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या सहायक संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यांवर टाकण्यात यावी.

६. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणाने आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

७. याबाबतचा खर्च “मागणी क्रमांक-के-६, २८१०, नवीन व नवीकरणीय ऊर्जा, ६०, इतर,८००, इतर खर्च (००)(०५) महाराष्ट्र ऊर्जा विकास निधीमधून भागविलेला खर्च (कार्यक्रम), ५० इतर खर्च (२८१००१२३)” या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. हरीत ऊर्जा निधी कार्यक्रम (G.C.F.) अंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना निधी वितरीत करतांना महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१९ शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९ च्या परिशिष्टातील तपासणी सूचीमधील अ.क्र. ३ व ९ येथील अटींची व या परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ मधील प्रत्येक अटीची पूर्तता होत असून, शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०१८/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९ मधील सूचनांनुसार अर्थसंकल्पित तरतूदीच्या कमाल ६० टक्केच्या मर्यादेत विभागाला प्राप्त अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२००२२८१६०४०७७५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nanasaheb Rajaram Dhane

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, serialNumber=6c39e2858150dbdfcfe6cd25ed08adf59f4d2fd8c1ede1730735f604904bf3bb, cn=Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2020.02.28 16:06:28 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे म्हाडा कमर्शियल कॉम्प्लेक्स, सर्व्हे नं. १९१-ए-फेज, येरवडा, पुणे- ४११ ००६.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई- ४०० ००१
३) महालेखापाल, महाराष्ट्र-२, ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) अवर सचिव ( रोख/प्रशासन ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.३२
८) अवर सचिव ( ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) निवड नस्ती, ऊर्जा-७.

## परिशिष्ट - अ

### शासन निर्णय क्रमांक-बीयुडी/२०१९/प्र.क्र.२९४/ऊर्जा-७, दि. २८/०२/२०२० सोबतचे सहपत्र.
### वित्तवर्ष २०१९-२०: हरित ऊर्जा निधी कार्यक्रम
### सहवीज निर्मिती प्रकल्पांची यादी.

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | क्षमता (मे.वॅ.) | संबंधित धोरण व कार्यपध्दती | मूलभूत सुविधा संमती दिनांक | प्रकल्प कार्यान्वितेचा दिनांक | निष्कासन व्यवस्था खर्च (रू. लक्ष मध्ये) | भांडवली अनुदान (रू.लक्ष मध्ये) | एकूण (रू.लक्ष मध्ये) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | मे. भिमाशंकर सहकारी साखर कारखाना लि., आंबेगाव, ता.जुन्नर, जि.पुणे. | १९.०० | १४.१०.२००८ व १४.०७.२०१० | ०३.११.२०१२ | ०४.११.२०१३ | १६९.१८ | १००.०० | २६९.१८ |
| २. | कर्मयोगी शंकररावजी पाटील, सहकारी साखर कारखाना लि., फुले नगर, बिजवडी, ता. इंदापूर, जि. पुणे. | १९.५० | १४.१०.२००८ व १४.०७.२०१० | ०५.०२.२०१३ | १३.११.२०१३ | १२६.२५ | १००.०० | २२६.२५ |
| | **एकूण** | **७१.५०** | | | | **२९५.४३** | **२००.००** | **४९५.४३** |

## परिशिष्ट - ब

### लघुजल विद्युत निर्मिती प्रकल्पांची यादी.

| अ.क्र. | विकासकाचे नाव | प्रकल्पाचे नाव | क्षमता (मे.वॅ.) | मूलभूत सुविधा संमती दिनांक | प्रकल्प कार्यान्वितेचा दिनांक | निष्कासन व्यवस्था खर्च (रू. लक्ष) | भांडवली अनुदान रु. (लक्ष) | एकूण रु.(लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | मे.अशोका बिल्डकॉन लि.,नाशिक | वाघुर जलविद्युत प्रकल्प | १.५० | ०७.०९.२०१३ | १७.०२.२०१७ | १००.०० | १००.०० | २००.०० |
| २ | मे.आरती हायड्रो पॉवर प्रोजेक्टस, सांगली | गोसी खुर्द जलविद्युत प्रकल्प | २.५० | २३.१२.२०१६ | ०३.०९.२०१९ | १००.०० | १००.०० | २००.०० |
| ३. | मे.रोहण राजदीप कंपनी लि., पुणे | चिकोत्रा जलविद्युत प्रकल्प, ता.आजरा, जि.कोल्हापूर | १.८० | ०८.१०.२०१४ | १५.०३.२०१७ | ६२.२३ | १००.०० | १६२.२३ |
| ४. | मे.अशोका स्थापत्य प्रा.लि., सातारा | गुंजावणी जलविद्युत प्रकल्प, ता.वेल्हे, जि. पुणे. | २.०० | १०.०७.२०१७ | २५.११.२०१८ | १००.०० | १००.०० | २००.०० |
| | | **एकूण** | **१०.७०** | | | **३००.००** | **४००.००** | **७६२.२३** |

<u>परिशिष्ट-क</u>

**शासन निर्णय क्रमांक-बीयुडी/२०१९/प्र.क्र.२९४/ऊर्जा-७, दि. २८/०२/२०२० सोबतचे सहपत्र.बायोगॅस तंत्रज्ञानावर आधारीत विकेंद्रित वीज निर्मिती प्रकल्पांची यादी.**

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | क्षमता ( कि. वॅ.) | प्रस्तावित निधी ( रु. लाख ) |
|---|---|---|---|
| १. | श्री. नामदेव लक्ष्मण घोझे, मु.पो. झांबवडे, ता. मावळ, जि. पुणे. | २४ | ९.६० |
| २. | कल्याण डोंबिवली महानगरपालिका, मौजे उंबरडे, कल्याण (प.), ता. कल्याण, जि. ठाणे | ६० | २४.०० |
| ३. | कल्याण डोंबिवली महानगरपालिका, मौजे आयरेगांव, डोंबिवली (प.), ता. कल्याण, जि. ठाणे | ६० | २४.०० |
| ४. | मे. माधुरी डेअरी प्रा.लि., नारायणवाडी गांव, पाचवड फाटा, ता. कराड, जि. सातारा. | ६० | २४.०० |
| ५. | मे. ऐवी ब्रॉयलर्स गट न. ३७५, मु.पो. सिरसाने, ता. चांदवड, जि. नाशिक. | १६८ | ६७.२० |
| ६. | मे. इंडोकाउंट लि., टी.-३, कागल, हातकणंगले, एम.आय.डी.सी. भाग, जि. कोल्हापूर. | २०० | ८०.०० |
| ७. | मे. प्रविण सावरकर, गट नं. २५, येलगांव, ता. अकोला, जि. अकोला. | १२ | ४.८० |
| ८. | श्री. शिवम भारत जाधव, मु. पो. पुसेगांव, ता. खटाव, जि. सातारा. | २४ | ९.६० |
| ९. | मे. भाग्यलक्ष्मी डेअरी फार्म्स प्रा. लि., मंचर, आंबेगांव, पुणे | २५० | १००.०० |
| १०. | अहमदनगर जिल्हा शेळीपालन व प्रक्रिया, मु. पो. वाडेगांव तांदळी, ता. अहमदनगर, जि. अहमदनगर. | ३६ | १४.४० |
| ११. | मे. हरदोली फार्म्स प्रा. लि., हारदोली, ता. तुमसर, जि. भंडारा. | २० | ०८.०० |
| १२. | श्री. विनोद रामकृष्ण कुलकर्णी, मु.पो. आरग, ता. मिरज, जि. सांगली. | १९२ | ७६.८० |
| १३. | श्री. शुभम भास्कर घुले, मु. पो. धांडरफुल बु., ता. संगमणेर, जि. महमदनगर. | १२ | ०४.८० |
| १४. | श्रीमती. रुक्मीणीबाई खोबारजी भुमारे, मु.पो. माउली, ता. गंगाखेड, जि. परभणी. | ६ | २.४० |
| १५. | श्री. शिवाजी मानिकराव पवार,मु.पो. माउली, ता. गंगाखेड, जि. परभणी. | ६ | २.४० |
| १६. | श्री. गुजेबा आबाजी म्हेत्रे, मु.पो. दहीड खुर्द, ता. बुलढाणा, जि. बुलढाणा. | ६ | २.४० |
| १७. | श्री. सुबोध सुहास नाईक, मु.पो. कोपर्डी, ता. खंडाळा, जि. सातारा. | ९६ | ३८.४० |
| १८. | मे. एस अँड पी फीड्स प्रा. लि., मु.पो. थेंगोडा, ता. बागलन, जि. नाशिक | २५० | १००.०० |
| १९. | मे. शबाना सलिम तांबोळी, मु. संगम, ता. माळशिरस, जि. सोलापूर. | ३६ | १४.४० |
| २०. | मे. मनोरव्हीआ अॅग्रो फूड्स, जि. पुणे | २४ | ९.६० |
| २१. | मे. प्रभात पोल्ट्री फीड्स, जि. राजगड, | १२० | ४८.०० |
| २२. | मे. एम.जी.एम. कॉलेज, जि. औरंगाबाद | २४ | ९.६० |
| २३. | मे. उल्हास मेडीकल कॉलेज | १२ | ४.८० |
| २४. | मे. श्रीलाजी डेअरी, जि. नागपूर | १८ | ७.२० |
| २५. | श्री. योगेश भुजबळ, जि. पुणे | ६० | २४.०० |
| २६. | मे. कन्हेर मठ, जि. कोल्हापूर | ६० | २४.०० |
| २७. | मे. मर्चंट डेअरी, जि. पुणे | १२ | ४.८० |
| २८. | मे. अतुल डेअरी, जि. नाशिक | ६० | २४.०० |
| २९. | मे. वृशाली विनोद कुलकर्णी, जि. सांगली | ६० | २४.०० |
| | **एकूण** | **१९६८** | **७८७.२०** |

## परिशिष्ट - ड

**शासन निर्णय क्रमांक-बीयुडी/२०१९/प्र.क्र.२९४/ऊर्जा-७, दि. २८/०२/२०२० सोबतचे सहपत्र.**

**वित्तवर्ष २०१९-२०: हरित ऊर्जा निधी कार्यक्रम-सौर उष्णजल संयंत्र लाभार्थ्यांची विभागवार संख्या**

| अ.क्र. | विभागाचे नांव | तपासणी साईट | एकूण किंमत (रू. लक्ष) |
|---|---|---|---|
| १. | औरंगाबाद | २० | ३६.६० |
| २. | पुणे | २०६ | ११२४.५५ |
| ३. | नाशिक | २५ | ६८.७५ |
| ४. | नागपूर | ७ | १४.८० |
| ५. | चंद्रपूर | ३ | १.२५ |
| ६. | मुंबई | ४८ | १९३.२५ |
| ७. | अमरावती | १० | ३०.२० |
| ८. | लातूर | १७ | ९.०० |
| ९. | कोल्हापूर | २० | ६८.९५ |
| | **एकूण** | **३५६** | **१५४७.३५** |

## परिशिष्ट - ई

**सौर औष्णिक कार्यक्रम प्रकल्पांची यादी**

| अ.क्र. | प्रकल्पाचे नांव | अर्ज | प्रकल्प साईज (sq.m.) | प्रकल्प किंमत (रू. लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १. | मे. इंडियन ओव्हरसीज फॅक्टरी, नागपूर | स्वयंपाक | २१० | ३८.२३ |
| २. | मे. हजरुद्दीन मोहम्मद ताज बाग सोसायटी, नागपूर | स्वयंपाक | ३१० | ७२.०० |
| ३. | मे. स्वॅमको इंडस्ट्रिज प्रा.लि., नागपूर | अन्न प्रक्रिया | २८० | ५६.२५ |
| ४. | मे. स्वॅमको इंडस्ट्रिज प्रा.लि., नागपूर | अन्न प्रक्रिया | २३० | ५४.०० |
| ५. | मे. नवयुवक आदिवासी ग्रामीण विकास संस्था, शिवणी, रामटेक, नागपूर | स्वयंपाक | ५६० | ११०.०० |
| ६. | मे. सर्च फाउंडेशन, चंद्रपूर | स्वयंपाक | २४० | ४५.०० |
| ७. | मे. डेअरी कॉलेज ऑफ इंजिनिअरींग | अन्न प्रक्रिया | ५२० | १०३.०० |
| | **एकूण** | | **२३५०** | **४७८.४८** |